अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नती
दिनांक प्रदान करण्याबाबत-
निवडसूची सन २०१४-२०१५
श्री.रा.चौ.सरवदे, अवर सचिव

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक- असप-१२१७/प्र.क्र. २७/का.१४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १४ जून, २०१७

संदर्भ - १. शासन आदेश क्र.असप १२१७/ प्र.क्र.२७ /का.१४, दि.३०.०३.२०१७.
२. शासन परिपत्रक क्र. कअप-१२१६/प्र.क्र.४०/का.१४-ब, दि.०२.०५.२०१७

**शासन आदेश**

अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीच्या सन २०१४-१५ च्या निवडसूचीवर पात्र ठरलेल्या अधिकाऱ्यांना संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशान्वये अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचे दिनांक प्रदान करण्यात आले आहेत. सदर निवडसूचीवर अजा प्रवर्गात श्री. वि.भा.सोनावणे, अवर सचिव हे पात्र ठरल्याने त्यांना अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक ०२-०८-२०१५ हा प्रदान करण्यात आला होता.

२. आता, कक्ष अधिकारी संवर्गाच्या दि.०१.०१.२००७ ते ०१.०१.२०१० रोजीच्या अंतिम ज्येष्ठतासूची संदर्भाधीन क्र.२ च्या शासन परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात आल्या आहेत. सदर दि.०१.०१.२०१० रोजीच्या अंतिम ज्येष्ठतासूचीनुसार, श्री.वि.भा.सोनावणे, अवर सचिव (अजा प्रवर्ग) यांच्या ज्येष्ठतेत बदल झाला असून श्री.रा.चौ.सरवदे, अवर सचिव (अजा प्रवर्ग) हे श्री.सोनावणे, अवर सचिव यांना सेवाज्येष्ठ ठरले आहेत. त्यामुळे, अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीच्या सन २०१४-१५ च्या निवडसूचीतून अजा प्रवर्गातील सेवाकनिष्ठ अधिकारी, श्री. वि.भा.सोनावणे, अवर सचिव यांचे नाव याद्वारे वगळण्यात येत असून त्यांना देण्यात आलेला अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक ०२.०८.२०१५ हा रद्द करण्यात येत आहे. श्री.वि.भा.सोनावणे, अवर सचिव यांचा समावेश पुढील निवडसूचीत करण्यात येईल.

३. श्री.रा.चौ.सरवदे, अवर सचिव हे अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीसाठीच्या सन २०१४-१५ च्या निवडसूचीवर पात्र ठरले असल्याने, त्यांना पुढील विवरणपत्रातील स्तंभ ५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | श्री/ श्रीमती | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | विभागाचे नाव | अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री | रा.चौ.सरवदे | अजा | उवतंशिवि | ०२-०७-२०१५ |

४. श्री. सरवदे, अवर सचिव यांना अवर सचिव पदावरील देण्यात आलेला नियमित पदोन्नतीचा दिनांक हा मा. उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मधील अंतीम निर्णयाच्या अधीन राहून तसेच याचिका क्र. २९८२/२०००, २९८६/२०००, ४९५८/२००३, मधील निर्णयाच्या अधीन त्याचप्रमाणे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहतील.

५. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०६१४१७२६०७४००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.06.14 17:23:29 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग,
२. सह/उप सचिव (आस्थापना), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. सह/उप सचिव (आस्थापना), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. श्री.वि.भा.सोनावणे, अवर सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. श्री.रा.चौ.सरवदे, अवर सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
६. कार्यासन अधिकारी, कार्यासन १२/१४-ब , सामान्य प्रशासन विभाग,
७. निवडनस्ती/कार्यासन-१४.
८. कार्यासन-१४, नियमित संग्रह.